**सन २००७-०८ चा "नागरी अहवाल"**
**लेखापरीक्षा अहवालातील परिच्छेदांवर**
**कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्र: भानिम-२०१०/प्र.क्र.७६/वित्त-८
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ डिसेंबर, २०१०

**प्रस्तावना :-**

भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या दि. ३१ मार्च, २००८ रोजी संपलेल्या वर्षाच्या नागरी अहवालातील परिच्छेद क्र. ४.५.६ मध्ये लेखापरीक्षा अहवालातील परिच्छेदांबाबत योग्य ती कार्यवाही करणे, लेखापरीक्षा समितीच्या बैठका आयोजित करणे तसेच अहवालावरील लोकलेखा समितीच्या सूचनांप्रमाणे कार्यवाही करणे. याबाबत काही विभागानी दिरंगाई केली असल्याचे नमूद केले आहे. यानुसार ग्राम विकास विभागाकडे ८९१ परिच्छेद प्रलंबित दर्शविले आहेत. नागरी अहवालातील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने २१ प्रलंबित दर्शविली आहेत. या प्रकरणी महालेखापरीक्षकांनी उपरोक्त परिच्छेद ४.५.६ मध्ये प्रलंबित परिच्छेदांवर त्वरित कार्यवाही अहवाल मिळविण्यासाठी व यादीतून अंतिमत: प्रलंबित परिच्छेद काढून टाकण्याकरिता खालील शिफारशी केल्या आहेत.

अ) ठरवून दिलेल्या वेळेमध्ये लेखापरीक्षा अहवाल / परिच्छेदांना उत्तर न पाठविणा-या अधिका-यांवर कार्यवाही करावी.

ब) नुकसान / प्रलंबित अग्रीम / जादा अदायगी यांची वसूली ठरवून दिलेल्या वेळापत्रकाप्रमाणे करावी.

क) लेखा परीक्षा निरीक्षणांवर योग्य ते उत्तर मिळण्याकरिता विभागीय कार्यपध्दतीवर पुनर्विचार करावा.

ग्राम विकास विभागाने जिल्हावार लेखापरिक्षा समित्यांची स्थापना केली आहे. नियमितपणे जिल्हास्तरीय लेखा परिक्षा समित्यांच्या बैठका घेण्यात येतात अशी धारणा आहे. तथापि मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी प्रलंबित परिच्छेद निकाली काढण्यासाठी सदर बैठकीच्या वेळेस आवश्यक कागदपत्रे तयार ठेऊन माहिती पुरविल्याची योग्य ती दक्षता घेतली नसल्याचे परिच्छेदांवरील संख्येवरुन दिसून येते. अशी विभागनिहाय प्रलंबित परिच्छेदांची संख्या पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (DRDA) | - ६३४ |
| सामाजिक वनीकरण (Social Forestry) (A.G. नागपूर कडील) | - १६३ |
| जलसंधारण | - ०९ |
| ग्राम विकास विभाग खुद्द | - २८ |
| भूजल सर्व्हेक्षण (पाणी पुरवठा) | - ५७ |
| एकूण | ८९१ |

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन खालील सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :

कृ.मा.प.

**परिपत्रक :-**

यापुढे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी लेखापरीक्षणाचे कालावधीत आवश्यक कागदपत्रे व परिपूर्ण माहिती संबंधित लेखा अधिका-यांना / परिक्षकांना पुरविण्याची व आक्षेपांची / परिच्छेदांची संख्या कमी होईल याची दक्षता घ्यावी. तसेच प्रलंबित परिच्छेद वगळल्याचे महालेखापाल कार्यालयाकडून लेखी पत्र घेऊन सदर माहिती तात्काळ शासनास सादर करावी. जेणेकरुन महालेखापाल यांनी ग्रामविकास व जलसंधारण विभागाकडे प्रलंबित दर्शविलेल्या एकूण परिच्छेदांबाबत आवश्यक ताळमेळ घेणे सोयीस्कर होईल. लेखा परिक्षा आक्षेपाचा गांभीर्याने विचार करुन ते तातडीने निकाली काढण्याच्या दृष्टीने व पुन्हा अशा प्रकारचे आक्षेप न येण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाहीच्या सूचना देण्यात येत आहेत :-

१. ग्राम विकास विभागाचे अधिनस्त सर्व नियंत्रण अधिका-यांनी / सर्व विभागीय आयुक्तांनी / सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी प्रत्येक महिन्याला त्यांचेशी संबंधित प्रलंबित परिच्छेदांचा आढावा घ्यावा.

२. लेखापरिक्षा समितीच्या जिल्हास्तरीय बैठका तात्काळ आयोजित करण्याची विभागीय आयुक्त व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी दक्षता घ्यावी व तसे महालेखाकार मुंबई / नागपूर यांना कळवावे.

३. सदर लेखापरिक्षा समितीच्या बैठकांमध्ये निकाली काढण्यात आलेल्या प्रलंबित निरीक्षण अहवाल/परिच्छेदांची माहिती मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी ग्रामविकास विभागास दरमहा पाठवावी.

४. ज्या विभागातील जिल्हावर लेखापरिक्षा समितीच्या बैठका होणार नाहीत, त्या विभागातील मुख्य कार्यकारी अधिकारी हे शासकीय हिताचे रक्षण आणि जबाबदारीचे पालन करत नसल्याबद्दल जबाबदार राहतील याची कृपया नोंद घ्यावी.

५. महालेखापरीक्षक यांच्या अहवालातील परिच्छेदांवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने ज्या कार्यासनांनी मा.सचिवांच्या मान्यतेने महालेखाकार यांचेकडे पाठविलेली नाहीत, ती त्वरित पाठविण्याची दक्षता घ्यावी.

६. विनियोजन लेख्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने / N.O.E. वेळेवर न पाठविणा-या अधिकारी / कर्मचारी यांचे विरुध्द शासनाचे निर्देशाप्रमाणे शिस्तभंगाची कारवाई करावी व त्याचा अहवाल शासनास वित्त विभागाचे परिपत्रक क्र.लोलेस १०.०६/प्र.क्र.९३/लोलेस, दि.१० मे, २००६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे विहीत प्रपत्रात देण्यात यावा.

७. लोकलेखा समितीने केलेल्या शिफारशीवरील कार्यवाही कृती टिप्पण्या (Action taken notes) महालेखापालाच्या मान्यतेने त्वरीत वित्त-८ (१०० प्रती) कार्यासनास पाठवाव्या.

सदर सूचनांची काटेकोरपणे दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१२१८२०१५१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(ना. र. भागवत)
उपसंचालक, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व सहसचिव / उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व जिल्हाधिकारी

४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
५. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकरी, जिल्हा परिषद
६. सर्व प्रकल्प संचालक जिल्हा ग्राम विकास यंत्रणा
७. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), नागपूर
९. सह सचिव, लोकलेखा समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय
११. निवड नस्ती (कार्यासन वित्त-८)

------